भंडारा जिल्ह्यातील उपजिल्हा रुग्णालय, साकोली व ग्रामीण रुग्णालय, अड्याळ, जि.भंडारा येथे पुरविण्यात आलेल्या कंत्राटी वाहन चालक सेवेचे प्रलंबित देयके अदा करण्यास परवानगी देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय, क्रमांकः २०२४/प्र.क्र.९० /आरोग्य ४**
१० वा मजला, संकुल इमारत,
जी.टी. रुग्णालय आवार, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : २८ मार्च, २०२४.

**वाचा :**

सह संचालक, आरोग्य सेवा रुग्णालय (राज्यस्तर), मुंबई यांचे पत्र क्र. जाक्र/आसेआ/कक्ष-३/टे-९/जिरुनं/ वाहन सेवा प्रलंबित देयके /२५०९/२४ दि. १४.०१.२०२४

**प्रस्तावना :**

भंडारा जिल्ह्यातील उपजिल्हा रुग्णालय, साकोली येथे पुरविण्यात आलेल्या कंत्राटी वाहन चालक सेवेचे माहे जून, २०१८ ते मार्च, २०१९ या कालावधीतील व ग्रामीण रुग्णालय, अड्याळ, जि. भंडारा येथे माहे एप्रिल, २०१९ ते ऑक्टोबर, २०१९ या कालावधीतील प्रलंबित देयके अदा करण्यास मंजुरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

## शासन निर्णय :

जिल्हा शल्यचिकित्सक, भंडारा यांचे अधिनस्त उपजिल्हा रुग्णालय, साकोली येथे मे. आदर्श बहुउद्देशीय सुशिक्षित बेरोजगार सेवा सह. संस्था, तुमसर, जि. भंडारा यांच्याकडून पुरविण्यात आलेल्या कंत्राटी वाहन चालक सेवेचे माहे जुन, २०१८ ते मार्च, २०१९ या कालावधीतील रु. ८५,२००/- (अक्षरी रुपये पंच्याऐंशी हजार दोनशे फक्त) इतक्या रक्कमेचे व ग्रामीण रुग्णालय, अड्याळ, जि. भंडारा येथे माहे एप्रिल, २०१९ ते ऑक्टोबर, २०१९ या कालावधीतील कंत्राटी वाहनचालक सेवेची रु.५९,६४०/- (अक्षरी रुपये एकोणसाठ हजार सहाशे चाळीस फक्त) असे एकूण रु. १,४४,८४०/- (अक्षरी रुपये एक लक्ष चौव्वेचाळीस हजार आठशे चाळीस फक्त) इतक्या रक्कमेची प्रलंबित देयके अदा करण्यास मंजुरी देण्यात येत आहे.

| अ.क्र | आरोग्य संस्थेचे नाव | पुरवठादाराचे नाव | प्रलंबित देयकांचा कालावधी | प्रलंबित देयकाची रक्कम |
|---|---|---|---|---|
| १. | उपजिल्हा रुग्णालय, साकोली, जि. भंडारा | मे. आदर्श बहु. सुशिक्षित बेरोजगार सेवा सह. संस्था, तुमसर, जि. भंडारा | माहे जुन, २०१८ ते मार्च, २०१९ | रु. ८५,२००/- |
| २. | ग्रामीण रुग्णालय, अड्याळ, जि. भंडारा | | माहे एप्रिल २०१९ ते ऑक्टोबर, २०१९ | रु. ५९,६४०/- |
| | **एकूण** | | | **रु. १,४४,८४०/-** |

**अटी व शर्ती-:**

१) यापूर्वी देण्यात आलेल्या कार्यरंभ आदेशातील व करारातील अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन होत असल्याची खात्री संबंधित अधिकाऱ्यांनी करावी.

२) सदर प्रलंबित देयके अदा करतांना वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचना/शासन निर्णय/परिपत्रके/नियम यांचे काटेकोरपणे पालन करण्याची जबाबदारी संबंधित अधिकाऱ्याची राहील.

३) सदर देयके योग्य असल्याची तसेच प्रलंबित देयके दुबार अदा करण्यात आले नसल्याची खातरजमा करुनच अदायगी करण्यात यावी, याबाबतची जबाबदारी जिल्हा शल्यचिकित्सक, नंदूरबार यांची राहील.

२. सदर खर्च मागणी क्रमांक आर-१, २२१० वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य २२१० ०४१३ व २२१०४६२४ (१०-कंत्राटी सेवा) यामधून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३ विनियम, भाग-२ दि.१७ एप्रिल, २०१५ चे परिशिष्ट वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग - पहिला, उपविभाग - एक मधील अनुक्रमांक ६, नियम क्र. ४० अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार व त्यात नमुद अटीची पुर्तता करण्याच्या अटीच्या अधिन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३२८१०५२२८१९१७ असा आहे. आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NEELAM GIRISH SANGWAI

Digitally signed by NEELAM GIRISH SANGWAI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=a9bbc429d62201a67249f70e60acdfadbff901fbbbf45cc393dbd6aa91fbd6ca, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=81E4E52421D72A2AE32DF6C7D06ABB4E6A7B5820C3A929F328AD6C0DCA4F38C7, cn=NEELAM GIRISH SANGWAI
Date: 2024.03.28 16:11:54 +05'30'

**( नीलम संगवई )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र- १/ २ (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
२. आयुक्त आरोग्य सेवा, तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
३. सह संचालक, आरोग्य सेवा (रुग्णालय राज्यस्तर), मुंबई.
४. उपसंचालक, आरोग्य सेवा, नागपूर मंडळ, नागपूर.
५. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णालय, भंडारा.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, जि. भंडारा.
७. वैद्यकीय अधिक्षक, उपजिल्हा रुग्णालय, साकोली व ग्रामीण रुग्णालय, अड्याळ, जि. भंडारा
८. निवडनस्ती (आरोग्य-४).